**स्थानिक स्वराज्य संस्थेमधील उच्च प्राथमिक शाळांमध्ये अंशकालीन निदेशकांचा कायम संवर्ग निर्माण करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०२१/प्र.क्र.३०/एसडी-१

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक : ०५ जुलै २०२४.

**प्रस्तावना :-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ (RTE Act, २००९) मधील अनुसूचीमध्ये प्रत्येक शाळेसाठी निकष व दर्जा नमूद केलेला आहे. त्यातील अ.क्र.१(b)(३)(ii) मध्ये असे नमूद केले आहे की, इयत्ता ६ वी ते ८ वीच्या वर्गातील ज्या उच्च प्राथमिक शाळांची विद्यार्थी पटसंख्या १०० पेक्षा जास्त आहे, अशा शाळांमध्ये अंशकालीन निदेशक (A) कला शिक्षण (B) शारीरिक शिक्षण व आरोग्य (C) कार्यशिक्षण (कार्यानुभव) या विषयांकरिता नेमण्याची तरतूद आहे. सदर तरतूदीनुसार अंशकालीन निदेशकांची नियुक्ती मानधन तत्वावर करण्यात आली आहे.

२. अंशकालीन निदेशकांची नियुक्तीबाबत श्री. बालाजी किशन आडे व इतर यांनी दाखल केलेली रिट याचिका क्र. ७१०६/२०१३ व इतर याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांच्या दिनाक ०९.०५.२०१४ रोजीच्या आदेशान्वये अंशकालीन निदेशकांची पदे भरण्याबाबत धोरण निश्चित करण्यास तसेच कायम संवर्ग तयार करण्याबाबत विचार करावा, अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत. तसेच, रिट याचिका क्र. ८७८६/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालयाच्या दि.०८.०५.२०२४ रोजीच्या अंतरिम आदेशाच्या अनुषंगाने स्थानिक स्वराज्य संस्थेमधील उच्च प्राथमिक शाळांमध्ये अंशकालीन निदेशकांचा कायम संवर्ग निर्माण करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अंशकालीन निदेशकांच्या नियुक्तीची प्रक्रिया, पदस्थापना व अंशकालीन निदेशकांच्या पदाचा कायम संवर्ग निर्माण करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १. | आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई. | सदस्य |
| ३ | संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे. | सदस्य |
| ४ | उप सचिव (विधी), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५ | सह सचिव/ उप सचिव (व्यय), वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६ | सह सचिव/ उप सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ७ | शिक्षण संचालक (प्राथमिक), प्राथमिक शिक्षण संचालनालय, पुणे. | सचिव |
| ८. | सह सचिव/ उप सचिव (एसडी), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१) मा. उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार अंशकालीन निदेशकांच्या नियुक्तीच्या अनुषंगाने कायम संवर्ग तयार करणे .

२) अंशकालीन निदेशकांच्या नियुक्तीच्या अटी व शर्ती ठरविणे .

३) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अंशकालीन निदेशकांच्या पदावर नियुक्त होण्यासाठी शैक्षणिक अर्हता व व्यावसायिक पात्रता निश्चित करणे.

४) अंशकालीन निदेशकांचे मानधन निश्चित करणे .

सदर समितीने आपला अहवाल एका महिन्याच्या आत शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०५१७५२०५०३२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.07.05 18:03:15 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व.
४. मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन (मुंबई सर्व).
५. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.

६. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
९. आयुक्त, महानगरपालिका, सर्व.
१०. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१३. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. शिक्षण संचालक (निरंतर), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. संचालक, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१७. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
१८. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती), पुणे.
१९. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.
२०. विभागीय शिक्षण उप संचालक. सर्व.
२१. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर), जिल्हा परिषद, सर्व.
२२. मुख्याधिकारी, नगरपालिका/नगर परिषद, सर्व.
२३. निवड नस्ती (कार्यासन-एसडी-१).